**विमानचालन संचालनालय,मुंबई या कार्यालयातील दोन वैमानिकांना "डल्लास, अमेरिका" येथे उजळणी प्रशिक्षणाकरिता पाठविण्यास मान्यता तसेच प्रशिक्षणावरील खर्चास मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र. विचासं-११२५/प्र.क्र.४८ /विमान-१,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ३२.

दिनांक:- ०१ एप्रिल, २०२५

**वाचा:** १) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११३/प्र.क्र.१३७/२८-अ, दि.९/७/२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेले मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०६.२०१३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/प्र.क्र.३५/२८-अ, दि.२३ एप्रिल,२०१८ अन्वये निर्गमित करण्यात आलेले मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.६.०४.२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. विचासं-१११८/प्र.क्र.८०/२८-अ, दिनांक ८/५/२०१८

४) एअरबस इंडिया प्रा.लि.कंपनीचा दि.१५.११.२०२४ रोजीचा ई-मेल संदेश.

५) विमानचालन संचालनालयाचे पत्र क्र.विचासं/जा.क्र.२७५/२०२५, दिनांक ३.०३.२०२५

**प्रस्तावना**

केंद्र शासनाच्या डी.जी.सी.ए. च्या CAR Section ८ Series H Part II Issue III मधील परिच्छेद ९.३.१ नुसार विमानचालन संचालनालय,मुंबई या कार्यालयातील प्रत्येक वैमानिकांना Level "D" Full Flight Simulator वर उजळणी प्रशिक्षण घेणे अनिवार्य आहे. त्यानुसार दि.१८ मे,२०२५ ते दि.३ जून, २०२५ या कालावधीत डल्लास,अमेरिका येथे वैमानिकांच्या उजळणी प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात आल्याचे एअरबस इंडिया प्रा.लि कंपनीने विमानचालन संचालनालय,मुंबई यांना संदर्भ क्र. ३ येथील दि.१५.११.२०२४ च्या ई-मेल संदेशाव्दारे कळविले आहे. सदर ई-मेल संदेशाच्या अनुषंगाने दि.१८ मे,२०२५ ते दि.०३ जून, २०२५ या कालावधीत डल्लास, अमेरिका येथील उजळणी प्रशिक्षणासाठी कॅप्टन महेंद्र दळवी,वैमानिक (हेलिकॉप्टर) आणि कॅप्टन मोहित शर्मा, वैमानिक (हेलिकॉप्टर) यांना पाठवण्याकरीता आणि त्यासाठी येणा-या खर्चास मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालय,मुंबई या कार्यालयातील कॅ.महेंद्र दळवी, वैमानिक (हेलिकॉप्टर) व कॅ.मोहित शर्मा, वैमानिक (हेलिकॉप्टर) या दोन वैमानिकांना डल्लास,अमेरिका येथील उजळणी प्रशिक्षणास पाठविण्यास व त्यासाठी येणा-या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विमानचालन संचालनालय,मुंबई या कार्यालयातील खालील तक्त्यात नमूद दोन वैमानिकांना त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या कालावधीमध्ये उजळणी प्रशिक्षणासाठी डल्लास, अमेरिका येथे जाण्यासाठी व त्याअनुषंगाने होणा-या अंदाजित एकूण रु. ९३,१६,३२१/- इतक्या प्रशिक्षण खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे संबंधित वैमानिकांना प्रशिक्षणास उपस्थित राहण्याकरिता दिनांक १८.०५.२०२५ (म.नं.) रोजी मुख्यालय सोडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वैमानिकाचे नाव व पदनाम | प्रशिक्षणाचा दिनांक | प्रशिक्षणाचा एकूण कालावधी | प्रशिक्षणाचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | कॅ.महेंद्र दळवी, वैमानिक (हेलिकॉप्टर) | दि.१८.०५.२०२५ (म.नं.) ते दि.०३.०६.२०२४ | १७ दिवस | डल्लास,अमेरिका |
| २ | कॅ.मोहित शर्मा, वैमानिक (हेलिकॉप्टर) | दि.१८.०५.२०२५ (म.नं.) ते दि.०३.०६.२०२४ | १७ दिवस | डल्लास,अमेरिका |

२. उपरोक्त प्रशिक्षणासाठीच्या खर्चाचे विवरण सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद करण्यात आले आहे.

३. सदर प्रशिक्षणासाठी एकूण दोन वैमानिकांचा डल्लास,अमेरिका येथे प्रशिक्षण दौ-याचा संपूर्ण खर्च व इतर कर असा अंदाजित एकूण रु.९३,१६,३२१/- एवढा खर्च येणार आहे. सदर खर्च सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या “मागणी क्र.ए-४ “२०७०-इतर प्रशासनिक सेवा ११४, परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) (२०७० ०१५६)” या लेखाशीर्षातर्गत “५० इतर खर्च” या उद्दिष्टाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. याकरीता उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२५०४०११७२१००२१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA RAJESH CHURI

Digitally signed by APARNA RAJESH CHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=f7c51cdde8909e037ec9e7d72236f3e3c46c61072b3926b1521c06f77d1662cb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1D4D6EA1D0CC1ED1FA0FC3C3FEB482175B2BC0C8BCF42B15DD3EE7D5CC3764F8, cn=APARNA RAJESH CHURI
Date: 2025.04.01 17:22:24 +05'30'

**(अ.रा.चुरी)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी सादर,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
३. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सामान्य प्रशासन विभाग /कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ३२.

शासन निर्णय क्र. विचासं-११२५/प्र.क्र.४८ /विमान-१, दिनांक ०१ एप्रिल, २०२५ सोबतचे सहपत्र

# परिशिष्ट-१

## राज्य शासनाच्या हेलिकॉप्टरवरील वैमानिकांच्या डल्लास,अमेरिका येथील उजळणी प्रशिक्षणासाठी लागणाऱ्या खर्चाचे विस्तृत विवरणपत्र

| अ.क्र. | खर्चाची बाब | वैमानिकांच्या प्रशिक्षणाकरिता येणारा खर्च |
|---|---|---|
| १. | मुख्यालय सोडण्याची तारीख | दि.१८ मे, २०२५ (म.नं.) |
| २. | प्रशिक्षणाचा कालावधी | १७ दिवस<br>{प्रशिक्षण दि.१८ मे, २०२५ (म.नं.) ते दि.०३ जून, २०२५} |
| ३. | प्रशिक्षणासाठी येणारा खर्च<br>(Recurrent Ground & Simulator Training) | US $७५,१८१.३४ = रु.६७,६६,३२१/- अंदाजे |
| ४. | दोन वैमानिकांच्या प्रवास खर्च | रु.१२,००,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) |
| ५. | निवास, टॅक्सी प्रवास, दैनिक भत्ता, प्रवास विमा, पासपोर्ट, व्हिसा व मोबाईल खर्च | रु.१३,५०,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) |
| ६. | इतर अनुषांगिक खर्च | प्रत्यक्ष खर्च |
| ७. | अंदाजित एकूण खर्च रुपये | रु. ६७,६६,३२१ + रु.२५,५०,००० = रु.९३,१६,३२१/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) |

APARNA RAJESH CHURI

Digitally signed by APARNA RAJESH CHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=f7c51cdde8909e037ec9e7d72236f3e3c46c61072b3926b1521c06f77d1662cb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1D4D6EA1D0CC1ED1FA0FC3C3FEB482175B2BC0C8BCF42B15DD3EE7D5CC3764F8, cn=APARNA RAJESH CHURI
Date: 2025.04.01 17:22:53 +05'30'

(अ.रा.चुरी)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन